**ग्राहक आयोगाचे बळकटीकरण व स्वच्छ ग्राहक मंच या केंद्र योजनेचा निधी केंद्रीय नोडल एजन्सीच्या संबंधित बँक खात्यात जमा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : ग्रासंअ-२०२०/प्र.क्र. ६१/ग्रासं-४**

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २३ मार्च, २०२३.

**संदर्भ** :- १) केंद्र शासनाचे पत्र क्र. J-२४/९/२०१८-CPU, दि. १३.११.२०१८.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. J-२४/१५/२०१७-CPU, दि. १८.१.२०२३.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. J-२४/३/२०१२-CPU, दि. २३.६.२०२२
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. J-४/४/२०२२-CPU, दि. २८.११.२०२२.
५) समक्रमांकाचा शासन निर्णय दि.८.२.२०२३

**प्रस्तावना : -**

संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये "स्वच्छता मिशन अंतर्गत स्वच्छ ग्राहक मंच" या योजनेअंतर्गत सन २०१८-१९ मध्ये रू. ३०.०० लाख इतका निधी केंद्र शासनाकडून राज्यास वितरित करण्यात आला होता. राज्यातील ४० जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगातील शौचालय दुरूस्ती/सुधारणा यांचेसाठी प्रति जिल्हा आयोग रू. ७५,०००/- या प्रमाणे रू.३०.०० लाख इतका निधी केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आला होता. सदर योजनेच्या अनुषंगाने सन २०१९-२० मध्ये स्वतंत्र लेखाशिर्ष (५४७५ ०२९३) उघडण्यात येऊन या लेखाशिर्षांतर्गत रू. ३०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात येत असून चालू आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्येही रू. ३०.०० लाख इतका निधी या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आलेला निधी चालू आर्थिक वर्षात खर्च करण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाकडे करण्यात विनंती करण्यात आली होती.त्याअनुषंगाने केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्र. २ येथील दि. १८.१.२०२३ च्या पत्रान्वये असे कळविले आहे की, "स्वच्छ ग्राहक मंच" या योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदरची योजना ही यापूर्वी चालू असलेल्या "ग्राहक मंचाचे बळकटीकरण- Strengthening of Cosumer Commission" या केंद्र योजनेचा भाग आहे. त्यामुळे "ग्राहक आयोगाचे बळकटीकरण" या योजनेचा राज्यांकडे अखर्चित असलेला निधी मार्च २०२२ पर्यंत खर्च करण्यास एक वेळची बाब म्हणून केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ३ येथील दि. २३.६.२०२२ च्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली असून त्यानुसार "स्वच्छ ग्राहक मंच"योजनेचा राज्याकडे अखर्चित असलेला निधीही सदर पत्राच्या मान्यतेअंतर्गत खर्च करण्यात यावा. सदर पत्राच्या अनुषंगाने नियोजन

व वित्त विभागास सादर करण्यात आलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निधीच्या वितरणास नियोजन व वित्त विभागाकडून मान्यता प्राप्त झालेली आहे.

३. “ग्राहक मंचाचे बळकटीकरण” या योजनेसाठी चालू आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष (५४७५ ०३०१), ३१, सहायक अनुदाने अंतर्गत रू. ५६.४९ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदरपैकी राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाकडून मागणी करण्यात आल्यानुसार रू. ५३,४६,९५६/- इतका निधी खर्च करण्यास संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णय दि. ८.२.२०२३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्र. ४ येथील दि.२८.११.२०२२ च्या पत्रान्वये दिलेल्या सूचनेनुसार सदरचा निधी केंद्र शासनाच्या केंद्रिय नोडल एजन्सीच्या कोटक महिंद्रा बँक खात्यात जमा करण्यात आला आहे. सदरचा निधी PFMS प्रणालीवर खर्चास उपलब्ध करणेसाठी केंद्र शासनास विनंती देखील करण्यात आली आहे.

४. “स्वच्छ ग्राहक मंच” या योजनेच्या अनुषंगाने केंद्र शासनाकडून प्राप्त रू. ३०.०० लाख इतक्या निधीच्या तुलनेत उस्मानाबाद,हिंगोली, धुळे व मध्य मुंबई येथील जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या कार्यालयाकडून रू. १०.३६ लाख इतक्या निधी खर्चास उपलब्ध करण्याची मागणी राज्य शासनाकडे प्राप्त आहे. तथापि, केंद्र शासनाच्या निर्देशानुसार केंद्र योजनेचा निधी प्रथमतः केंद्रीय नोडल एजन्सीच्या बँक खात्यात जमा करणे आवश्यक असल्याने आणि “स्वच्छ ग्राहक मंच” ही “ग्राहक आयोगाचे बळकटीकरण” या योजनेचा भाग असल्याने स्वच्छ ग्राहक योजनेचा रू. ३०.०० लाख इतका निधी आणि “ग्राहक आयोगाचे बळकटीकरण” या योजनेचे अद्याप अखर्चित असलेला उर्वरित रू.३,०२,०४४/- (रू. तीन लाख दोन हजार चव्वेचाळीस फक्त) (रू.५६,४९,०००- ५३,४६,९५६) असा एकूण मिळून रू.३३,०२,०४४/- इतका निधी केंद्र शासनाच्या “ग्राहक आयोगाचे बळकटीकरण” या योजनेच्या बँक खात्यात आता जमा करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. ग्राहक आयोगाचे बळकटीकरण व स्वच्छ ग्राहक मंच या केंद्र योजनांचा अखर्चित असलेला रू. ३३,०२,०४४/- (रू. तेहतीस लाख दोन हजार चव्वेचाळीस) इतका निधी आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांनी कोषागारातून त्यांचे बँक खात्यात आहरित करावा व तद्नंतर सदरचा निधी A/c ID :- ९३८८०७७७८६, IFSC code :- KKBK०००००१७२ या Strengthening of Consumer Commission या योजनेच्या केंद्रीय नोडल एजन्सीच्या खात्यात बँक खात्यात NEFT/IMPS द्वारे जमा करावा.

२. यासाठी रू.३,०२,०४४ /- (रू. तीन लाख दोन हजार चव्वेचाळीस फक्त) इतका निधी ५४७५, इतर सर्वसाधारण सेवांवरील भांडवली खर्च, १०२, नागरी पुरवठा, (००)(०३) ग्राहक मंचाचे बळकटीकरण (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना)(कार्यक्रम) (५४७५ ०३०१), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गतच्या अर्थसंकल्पित अनुदानातून आहरित करण्यात यावा व रू.३०,००,०००/- (रू. तीस लाख फक्त) इतका निधी ५४७५, इतर सर्वसाधारण सेवांवरील भांडवली खर्च, १०२, नागरी पुरवठा, (००)(०२) स्वच्छता अभियान योजनेंतर्गत स्वच्छ ग्राहक मंच (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (५४७५ ०२९३), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गतच्या अर्थसंकल्पित अनुदानातून आहरित करावा.

३. सदरचा निधी केंद्र शासनाच्या उक्त खात्यात परत करण्यात आल्यानंतर PFMS प्रणालीवर संबंधितांच्या मागणीनुसार खर्चास उपलब्ध होणेसाठी केंद्र शासनास कळविण्यात यावे.

४. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२३०३२४१३३२५३३४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KATIKAR PADMAVATI NARSINHA

Digitally signed by KATIKAR PADMAVATI NARSINHA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f3ed7c4a70450333ddeb12360222b6eeba04baea8be7dd665a54ae68862230de, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EC2D6C76E02D91EE9F71EFE012213AB98A56FDCC6BFFB5CE4EF3FAFA682EB741, cn=KATIKAR PADMAVATI NARSINHA
Date: 2023.03.24 13:38:17 +05'30'

**( पद्मावती काटीकर )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.वि) यांचे खाजगी सचिव.
२) अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
३) अ.मु.स. (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अ.मु.स. (नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, ( अ.ना.पु व ग्रा.सं.), मंत्रालय, मुंबई.
६) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अ.ना.पु. व ग्रा.सं.वि. मुंबई.
७) सह सचिव (ग्रासं-४), अ.ना.पु. व ग्रा.सं.वि. मुंबई.
८) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
१०)अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई

११) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.

१२) आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा, अ.ना.पु. व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय यांना निधी आहरित करणे आणि केंद्र शासनाच्या उक्त बँक खात्यात जमा करणच्या विनंती सह.

१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१४) निवडनस्ती/ग्रासं-४.